**ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांना कर वसुलीच्या प्रमाणात किमान वेतन अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः व्हीपीएम-२०१८/प्र.क्र.३९७/पं.रा-३**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई -४००००१
दिनांक: १७ सप्टेंबर, २०१८

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** व्हीपीएम २६९९/प्र.क्र.२०६(१)/२१, दि. २१ जानेवारी, २०००.
२) **शासन निर्णय क्रमांकः** व्हीपीएम२०१२/प्र.क्र.२३५/पंरा-३, दिनांक ४ मार्च, २०१४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम १९५८ मधील कलम ६१ प्रमाणे ग्रामपंचायतीला त्यांच्या आवश्यकतेप्रमाणे कर्मचारी नेमण्याचे व त्यांचे वेतन ठरविण्याचे अधिकार आहेत. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक ३ जुलै, १९९० च्या अधिसूचनेनुसार ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांना किमान व़ेतन लागू करण्यात आले आहे. त्यामुळे संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक २१ जानेवारी, २००० च्या शासन निर्णयान्वये लोकसंख्यानिहाय ग्रामपंचायतीचा आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर आकृतीबंधानुसार नेमलेल्या कर्मचा-यांना संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक ४ मार्च, २०१४ च्या शासन निर्णयान्वये ग्रामपंचायतीचे उत्पन्न व लोकसंख्येचा विचार करुन ग्रामपंचायत कर्मचा-यांच्या किमान वेतनासाठी खालीलप्रमाणे राज्य शासनाचा हिस्सा निश्चित करण्यात आला आहे.

| अ.क्र. | लोकसंख्या व उत्पन्नानुसार ग्रामपंचायतीची संख्या | किमान वेतनासाठी अनुज्ञेय शासन हिस्सा |
|---|---|---|
| १ | ० ते ५,००० पर्यंत लोकसंख्या असलेल्या व रु.० ते रु.२,००,००० पर्यत उत्पन्न असलेल्या ग्रामपंचायतींना | १००% |
| २ | ० ते १०,००० पर्यंत लोकसंख्या असलेल्या व रु.२, ००,००१ ते रु.३,००,००० उत्पन्न असलेल्या ग्रामपंचायतींना | ७५% |
| ३ | ३,००० ते १०,००० पर्यंत लोकसंख्या असलेल्या व रु.३,००,००१ ते रु.५,००,००० उत्पन्न असलेल्या ग्रामपंचायतींना | |
| ४ | उर्वरित सर्व ग्रामपंचायतींना शासन निर्णय दिनांक २१ जानेवारी, २००० नुसार (पूर्वीप्रमाणेच) | ५०% |

वर नमूद १०० % व ७५% प्रमाणे वाढीव हिश्यांस पात्र होण्यासाठी संबंधित ग्रामपंचायतीनी नियमाप्रमाणे दर चार वर्षानी नियमितपणे फेरआकारणी करणे व गत वर्षात सर्व करांच्या एकूण मागणीची ९०% वसूली करणे बंधनकारक राहील अशी अट संदर्भाधीन दिनांक ०४ मार्च, २०१४ रोजीच्या शासन निर्णयात नमूद करण्यात आली होती. तथापि, ९०% वसुली झाली नसल्यास किती

वेतन अदा करावे याबाबतची स्पष्टता सदर दिनांक ०४ मार्च, २०१४ रोजीच्या शासन निर्णयात नमूद करण्यात आलेली नाही. यास्तव, ज्या ग्रामपंचायतींची सर्व करांची वसुली ९०% पेक्षा कमी झालेली असेल त्या ग्रामपंचायतीतील कर्मचा-यांना किती किमान वेतन अदा करावे याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन दिनांक ०४ मार्च, २०१४ रोजीच्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार ग्रामपंचायत कर्मचा-यांना अदा करावयाच्या किमान वेतनाच्या राज्य शासनाच्या संपूर्ण हिश्यास पात्र होण्यासाठी संबंधित ग्रामपंचायतीनी नियमाप्रमाणे दर चार वर्षानी नियमितपणे फेरआकारणी करणे व गत वर्षात सर्व करांच्या एकूण मागणीची ९०% वसूली करणे बंधनकारक राहील. संबंधित ग्रामपंचायतींच्या सर्व करांच्या वसूलीच्या प्रमाणात ग्रामपंचायत कर्मचारी यांना खालीलप्रमाणे किमान वेतन अनुज्ञेय राहील:-

| अ.क्र. | ग्रामपंचायतींची सर्व करांच्या वसूलीची टक्केवारी | अनुज्ञेय किमान वेतन |
|---|---|---|
| १ | ९०% व त्यापेक्षा जास्त कर वसूली | १००% |
| २ | ७०% ते ८९% कर वसूली | ९०% |
| ३ | ५०% ते ६९% कर वसूली | ७०% |
| ४ | ५०% पेक्षा कमी वसूली | ५०% |

संदर्भाधीन दिनांक ०४ मार्च, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सूचित केल्यानुसार ग्रामपंचायतींची घरपट्टी व इतर सर्व करांच्या वसूलीची जबाबदारी ग्रामसेवक, सरपंच व पदाधिकारी तसेच ग्रामपंचायत कर्मचारी यांची राहील हे पुन्हा एकदा स्पष्ट करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय हा सन २०१८-१९ या आर्थिक वर्षापासून लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१७१५२३३५६८२० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Raghunath Bankar

Digitally signed by Sanjay Raghunath Bankar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Devlopment And Water Conservation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay Raghunath Bankar
Date: 2018.09.24 15:09:12 +05'30'

**( संजय बनकर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई .
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) सर्व विभागीय आयुक्त.
६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
८) सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
९) राज्य प्रकल्प संचालक, राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान/राष्ट्रीय ग्रामस्वराज्य अभियान,शिवसागर अपार्टमेंट,मोदी बाग,कृषी महाविद्यालय,शिवाजी नगर,पुणे-४११०१६.
१०) आहरण व संवितरण अधिकारी,रोख शाखा,ग्रामविकास विभाग,मंत्रालय,मुंबई
११) निवडनस्ती (कार्यासन पंरा-३)